“निसर्ग”चक्रीवादळामुळे बाधित झालेल्या जिल्हा परिषद प्राथमिक शाळांच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून निधी मंजूर करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय,क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.२२१/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ९ सप्टेंबर, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म -३, दि.१३.०५.२०१५
२) शासन निर्णय,महसुल व वन विभाग,क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र. २२१/म-३, दि.१९.०८.२०२०
३) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचेकडून प्राप्त प्रस्ताव

प्रस्तावना:

दिनांक ३ जून, २०२० रोजी “निसर्ग” चक्रीवादळाचा तडाखा राज्यातील काही जिल्हयांमध्ये बसला आहे. केंद्र शासनाने अधिसुचित केलेल्या विविध नैसर्गिक आपत्तीमध्ये झालेल्या नुकसानीसाठी संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या विविध बाबीसाठी त्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दराने मदत देय आहे.

निसर्ग चक्रीवादळामुळे पडझड झालेल्या प्राथमिक शाळांच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार जिल्हा परिषद प्राथमिक शाळा इमारतींच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी आगाऊ स्वरूपात संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रू १०००.०० लक्ष निधी वितरित करण्यात आला आहे. शालेय शिक्षण व क्रिडा विभागाकडून या विभागास प्राप्त झालेल्या सुधारित प्रस्तावानुसार या प्रयोजनासाठी एकूण रू १५५३.११ लक्ष निधी आवश्यक आहे. सदर प्रस्ताव राज्य कार्यकारी समितीच्या दि. ४.९.२०२० च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. राज्य कार्यकारी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार उर्वरित निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

“निसर्ग” चक्रीवादळामुळे पडझड झालेल्या जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळा इमारतींच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विभागीय आयुक्तांमार्फत संबंधित जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे निधी मंजूर करून वितरीत करण्यात आला आहे.

| अ.क्र. | जिल्हा | पडझड झालेल्या शाळांची संख्या | वितरीत केलेला निधी ( रू. लाखामध्ये ) |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | रायगड | ९३८ | ७५९.८६ |
| २ | रत्नागिरी | २८९ | १३०.०२ |
| ३ | ठाणे | ३२ | १८.१७ |
| ४ | पालघर | ८ | १.६२ |
| **कोकण विभाग** | | | **९०९.६७** |
| ५ | पुणे | २५४ | ६८.५३ |
| **पुणे विभाग** | | | **६८.५३** |
| ६ | नाशिक | १९ | २१.८० |
| **नाशिक विभाग** | | | **२१.८०** |
| **एकूण** | | | **१०००.००** |

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून प्राप्त झालेला सुधारित प्रस्ताव व राज्य कार्यकारी समितीने दि. ४.९.२०२० च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निसर्ग चक्रीवादळामुळे पडझड झालेल्या जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळा इमारतींच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मार्गदर्शक तत्वानुसार खालीलप्रमाणे सुधारित अंतिम निधी मंजूर करण्यात येत आहे. सदर निधीपैकी रू १०००.०० लक्ष इतका निधी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. वितरीत करण्यात आलेला सदर निधी समायोजित करून निव्वळ देय असलेला उर्वरित निधी रू ५५३.११ लक्ष ( रूपये पाच कोटी त्रेपन्न लक्ष अकरा हजार फक्त ) इतका निधी या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | शाळांची संख्या | मंजूर करण्यात येत असलेला निधी ( रू. लाखात ) | यापूर्वी वितरीत केलेला निधी (रू लाखात) | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी ( रू लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | रायगड | ९३८ | १२४९.४० | ७५९.८६ | ४८६.६९ |
| २ | रत्नागिरी | २५१ | १२७.१७ | १३०.०२ | ००.०० |
| ३ | पुणे | ६९ | १११.३० | ६८.५३ | ४२.७७ |
| ४ | ठाणे | ३२ | २८.४४ | १८.१७ | १०.२७ |
| ५ | नाशिक | १९ | ३४.२५ | २१.८० | १२.४५ |
| ६ | पालघर | ८ | २.५५ | १.६२ | ०.९३ |
| **एकूण** | | **१३१७** | **१५५३.११** | **१०००.००** | **५५३.११** |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर संबंधित विभागीय आयुक्त यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि. १९.८.२०२० च्या आदेशान्वये रत्नागिरी जिल्हयासाठी वरील प्रयोजनार्थ रू. १३०.०२ लक्ष ( रूपये एक कोटी तीस लाख दोन हजार फक्त ) इतका निधी आगाऊ स्वरूपात वितरीत करण्यात आला आहे. परंतु सुधारित मान्यतेनुसार रत्नागिरी जिल्हयास फक्त रू १२७.१७ लक्ष इतका निधी देय ठरत आहे. त्यामुळे रत्नागिरी जिल्हयास यापूर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी जादा वितरीत करण्यात आलेला रू २.८५ लक्ष ( रूपये दोन लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) इतका निधी बीम्स प्रणालीवर परत घेवून त्याचे रायगड जिल्हयास फेरवाटप करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्त, कोकण यांनी त्या प्रमाणे कार्यवाही करावी. या परिणामी रायगड जिल्हयास वरील प्रयोजनासाठी एकूण रू. १२४९.४० लक्ष इतका निधी वितरीत होईल.

४. उपरोक्त निधी खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यात यावा :

१) हा निधी केवळ जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळांच्या इमारतींच्या तातडीच्या दुरूस्तीसाठीच खर्च करावा.
२) जिल्हा परिषद प्राथमिक शाळा इमारतीच्या तातडीच्या दुरूस्तीसाठी प्रती शाळा इमारत रू २.०० लक्ष या मर्यादेत खर्च करण्यात यावा.
३) माध्यमिक शाळा इमारतींच्या दुरूस्तीसाठी हा निधी वापरण्यात येऊ नये.
४) अशासकीय/खाजगी संस्थांच्या शाळा इमारत दुरूस्तीसाठी हा निधी वापरण्यात येऊ नये.
५) ज्या प्राथमिक शाळा इमारतीच्या तातडीच्या दुरूस्ती करिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधी मधून या आदेशान्वये मंजूर केलेला सदर निधी वापरण्यात येईल, त्याच दुरूस्तीवर राज्य शासनाचा इतर निधी वापरून खर्चाची व्दिरुक्ती होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

६. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. तसेच उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील

७. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२, पुर , चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०६) नैसर्गिक आपत्तीमुळे अनुज्ञेय विभागातील आपत्तीग्रस्त पायाभुत सुविधांच्या तातडीच्या स्वरूपाच्या दुरूस्ती/ पुनर्स्थापनेसाठी खर्च (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २४६१) या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १९९/व्यय-९/२०२०, दिनांक ०९.०९.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९०९१५२५११४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.09.09 15:28:19 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
४. विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/नाशिक
५. जिल्हाधिकारी, रायगड/रत्नागिरी/पालघर/ठाणे/पुणे/नाशिक
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/रत्नागिरी/पालघर/ठाणे/पुणे/नाशिक,
१०. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )